**जनजाती क्षेत्र उपयोजना/जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना जून,२००९ अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पात समाविष्ट करण्यात आलेल्या "रस्ते व पूल" या शिर्षाखालील बी.आर.ओ. योजनांतर्गत राज्यस्तरीय तरतूदीचे वाटप.....**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.बीयुडी-२००९/प्र.क्र.२६/का.६**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- १० फेब्रुवारी,२०१०.**

**वाचा :** वित्त विभागाचे परिपत्रक क्र,पूरक - १०.०९/प्र.क्र.१५२/अर्थसंकल्प-३, दि.३० जून, २००९ -

**शासन निर्णय :-** महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २००९ (सन २००९ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.१३ ) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४ दिनांक ३० जून, २००९ रोजी पुरवणी मागण्यांच्या अर्थसंकल्पीय तरतूदीच्या वितरणासाठी पारित झाला आहे. सीमा रस्ते संघटन (बी.आर.ओ.) या शिर्षाखाली सन २००९-१० या चालू आर्थिक वर्षाकरिता रु.२०००.०० लाखाची तरतूद करण्यात आली होती. तथापि, अधिक्षक अभियंता, चंद्रपूर यांनी सन २००९-१० मध्ये बी.आर.ओ. रस्त्यांसाठी निधीची आवश्यकता नसल्याचे कळविले आहे. यास्तव बी.आर.ओ. याशिर्षाखाली सन २००९-१० साठी केलेल्या तरतूदीपैकी रु.१५००.०० लाखाची तरतूद धुळे जिल्ह्यासाठी व रु.५००.०० लाखाची तरतूद नाशिक जिल्ह्यासाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे. शासन आता या निर्णयाद्वारे सोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ-२ मध्ये दर्शविलेल्या योजनांच्या तरतूदी स्तंभ-३ मध्ये दर्शविलेल्या नियंत्रक अधिकाऱ्यांच्या अधिनस्त खर्च करण्यासाठी ठेवण्यास खालील अटींच्या अधिन राहून मंजूरी देण्यात येत आहे :-

अ) धुळे व नाशिक जिल्ह्यातील १०० व ९०% पूर्ण झालेल्या कामांसाठीच सदर तरतूदीतून निधी उपलब्ध करुन द्यावा.

ब) धुळे व नाशिक जिल्ह्यातील १०० व ९०% पूर्ण झालेली कामे ही आदिवासी उपयोजना क्षेत्रातील (टिएसपी) असावीत व अर्थसंकल्पात ( भाग तीन - परिशिष्टे - परिशिष्ट - ड) असावीत.

क) आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील रस्त्यांच्या कामांना निधी उपलब्ध करुन देता येणार नाही.

ड) धुळे व नाशिक जिल्ह्यातील १०० व ९०% पूर्ण झालेली कामे आदिवासी उपयोजनेखालील आहेत याबाबत अधिक्षक अभियंता यांच्या स्वाक्षरीने प्रमाणपत्र सादर करावीत व कोणत्या वर्षी अर्थसंकल्पीत झाली याचा उल्लेख करावा.

इ) आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील रस्त्यांच्या कामांना निधी उपलब्ध करुन दिल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित अधिक्षक अभियंता यांची राहील.

ई) ज्या कामावर खर्च करण्यात आला त्याची यादी माहितीसह आदिवासी विकास विभागास सादर करावी.

२. अंमलबजावणी अधिकारी आणि विभाग प्रमुख यांनी ही तरतुद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५ दिनांक ९.३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व क्षेत्राबाहेरील मान्य कार्यक्रमांवर/योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी. तसेच या तरतूदीप्रमाणे खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-२००३/प्र.क्र.१०१/का-६, दिनांक २६ जुलै, २००४ व टिएसपी-२००५/प्र.क्र.५९/का-६, दिनांक १० नोव्हेंबर, २००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी तसेच प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरित करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिका-यांनी घ्यावी. सदर तरतूदी संगणक वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहेत.

३. आदिवासी उपयोजना क्षेत्रातील ज्या रस्त्यांची कामे हाती घेण्यात आली आहेत त्याच रस्त्यांच्या कामांवर तरतूद खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील रस्त्यांवर खर्च करण्यात येऊ नये. आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील रस्त्यांची कामे जरी अर्थसंकल्पात समाविष्ट झाली असतील तरी आदिवासी उपयोजनेखालील तरतूद आदिवासी उपयोजना क्षेत्रबाहेरील रस्त्यांच्या कामावर खर्च करता येणार नाही. जर आदिवासी उपयोजनेखालील तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेरील रस्त्यांवर खर्च झाली तर त्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधित अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांची राहिल व झालेल्या खर्चाची भरपाई संबंधितांच्या वेतनातून करण्यात येईल.

४. आदिवासी उपयोजनेंतर्गत घेण्यात आलेली रस्त्यांची कामे या विभागाच्या शासन निर्णय क्र.टिएसपी १०८६/८७१०/प्र.क्र.३१/का.५, दि.९ मार्च, १९९० मध्ये नमूद केलेल्या गावांच्या यादीतील आहेत याची खात्री करुन तरतूद वितरीत करावी.

५. कोषागाराकडे देयके सादर करतांना कार्यकारी अभियंता यांनी स्वतःच्या स्वाक्षरीने सदर निधी आदिवासी उपयोजना क्षेत्रातील रस्त्यांवर खर्च होणार आहे असे प्रमाणपत्र द्यावे. सदर दाखला संबंधित प्रकल्प अधिकारी यांचा ग्राहय धरण्यात येणार नाही, याची दक्षता घ्यावी. स्वतः खात्रीकरुन संबंधित आहरित अधिकारी यांनी दाखला द्यावा.

६. अंमलबजावणी अधिकारी/विभाग प्रमुख यांनी प्रचलित नियम, कार्यपध्दती व सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन चालू योजनांवर खर्च करावा. हे आदेश फक्त अंमलबजावणी /नियंत्रक अधिका-यांच्या अधिनस्त ठेवलेल्या तरतुदीस प्रशासकीय दृष्टया मान्य केलेल्या चालू योजनांवर खर्च करण्यासाठी आहे. याची अंमलबजावणी अधिका-यांनी नोंद घ्यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक २०१००२१०१४५०४०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( श. र. सावंत )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर. (प्रत्येकी ५ प्रती)
**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक/कळवण, जि.नाशिक, तळोदा/नंदुरबार, जि.नंदुरबार.**
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
सार्वजनिक बांधकाम विभाग (अर्थ-१) (२ प्रती), मंत्रालय, मुंबई-३२.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, धुळे/नाशिक.
**सर्व अधिकारी / कार्यासने, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई**
ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, सहावा मजला, विधानभवन, मुंबई.
निवड नस्ती (का-६)

**जनजाती क्षेत्र उपयोजनेखालील २००९-१० चे जिल्हानिहाय अंदाजपत्रकीय तरतूदीचे वाटप**

**पूरक मागणी बाब क्र.३२९**

| शिर्ष : रस्ते व पूल.<br>योजनेचे नांव : जिल्हा व इतर मार्ग (सर्वसाधारण)<br>(रुपये हजारात) | | मागणी क्रमांक टी : ६<br>मुख्य लेखाशिर्ष : ५०५४-रस्ते व पूल यावरील भांडवली खर्च-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-जिल्हा व इतर मार्ग-७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०१) जिल्हा व इतर मार्ग (५०५४ ०४०२) ५३, मोठी बांधकामे | | |
|---|---|---|---|---|
| जिल्हयाचे नांव | २००९-१० साठी केलेली तरतूद | २००९-१० ची अर्थसंकल्पीय तरतूद सुपूर्द करण्यात आलेला नियंत्रक अधिकारी | प्रशासकीय विभाग | शेरा |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| नाशिक | ४३४७८ | संबंधित अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ | सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय | |
| धुळे | १३०४३५ | | | |
| **एकूण** | **१७३९१३** | | | |

**टिप : वरील तरतूद बांधकामावरील खर्चासाठी असून टक्केवारी खर्च वगळण्यात आला आहे.**